युद्धात/सैन्यदलातील सेवेत मृत्यु पावलेल्या किंवा अपंग झालेल्या सैनिकांच्या कुटुंबियांस शासकीय सेवेत भरती करिता पसंतीक्रम देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक आरटीए-१०८२/३५०२/सीआर-१००/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ सप्टेंबर १९८३.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एमसीएन-१०७५/२०३/१६, दिनांक १० नोव्हेंबर १९७६.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीए-१०७९/०/४८२/१६-अ, दिनांक ३ जुलै १९८०.

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आयपीई/आरटीए-१०८०/०/१८१/१६-अ, दिनांक १० ऑक्टोबर १९८०.

<u>शासन निर्णय</u> :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरटीए-१०७९/०/४८२/१६-अ, दिनांक ३ जुलै १९८० अन्वये माजी सैनिकांकरिता शासकीय सेवेतील वर्ग ३ व वर्ग ४ मध्ये असलेले १५ टक्के पदांचे आरक्षण कायम स्वरुपात करण्यात आलेले आहे. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एमसीएन-१०७५/२०३/१६, दिनांक १० नोव्हेंबर १९७६ अन्वये युद्धात किंवा सैन्य दलातील सेवेत असताना मृत्यू पावलेल्या सैनिकांच्या कुटुंबातील एका व्यक्तीस शासकीय सेवेत वर्ग ३ व वर्ग ४ मध्ये भरती करिता अग्रक्रम (Priority) देण्यात आला आहे. फेरविचार करुन याबाबत आता शासन असे आदेश देत आहे की :-

(१) माजी सैनिकांसाठी वर्ग ३ व वर्ग ४ मधील आरक्षित असलेल्या १५ टक्के पदांवर भरती करताना युद्ध काळात किंवा युद्ध नसताना सैन्यातील सेवेमुळे अपंग झालेल्या माजी सैनिकांना १५ टक्के राखीव पदांपैकी उपलब्ध पदांवर प्राधान्य क्रमाने नियुक्त करावे.

(२) युद्ध काळात किंवा युद्ध नसताना सैनिकी सेवेत मृत झालेल्या किंवा अपंगत्व येऊन त्यामुळे नोकरीसाठी अयोग्य झालेल्या माजी सैनिकांच्या कुटुंबातील फक्त एका व्यक्तीला त्या नंतरच्या पसंती क्रमाने वर्ग ३ व वर्ग ४ मधील १५ टक्के आरक्षित पदांपैकी उपलब्ध पदांवर नियुक्त करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. मळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे सचिव,

एच-६९३(४५००-९-८३)

पृ. मा. प.

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, सेवायोजन कार्यालय, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
शिक्षण व सेवायोजन विभाग,
ग्राम विकास विभाग,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, सेवापूर्व प्रशिक्षण संस्था, सिडको कॉलनी, नवीन औरंगाबाद ४३१ ००३,
सचिव, महाराष्ट्र राज्य सैनिक मंडळ, पुणे,
सचिव, सर्व जिल्हा सैनिक मंडळे (द्वारा संबंधित जिल्हाधिकारी),
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १२, १३-अ, १४-अ, १९, २८,
*सचिव, भारतीय सैनिक नाविक, वायुसेना मंडळ, नवी दिल्ली,
*महासंचालक, पुनर्वसन, भारत सरकार, संरक्षण मंत्रालय,
मौलाना आझाद रोड, नवी दिल्ली ११,
*सचिव, भारत सरकार, गृह मंत्रालय, सेवा प्रशासकीय सुधार विभाग, नवी दिल्ली,
व्यवस्थापकीय संचालक, सर्व महामंडळे/मंडळे व राज्य शासनाच्या अधिपत्याखालील
संस्थांचे प्रशासकीय अधिकारी.

---

*पत्राने.
*इंग्रजी भाषांतर.